**मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम या योजनेकरिता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षामध्ये निधी वितरण करणेबाबत.**
**(लेखाशिर्ष २८५१६६९२)**

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२१/प्र.क्र.१२/अर्थसंकल्प (विघयो)**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- १२ नोव्हेंबर, २०२१

वाचा :- १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४.१०.२०२१
२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाची नस्ती क्र.योजना-२०१९/प्र.क्र.१६१/ऊद्योग-७

**शासन निर्णय :-**

मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम या योजनेसाठी अनुसूचित जाती घटकांकरिता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, २८५१-ग्रामोद्योग व लघुउद्योग, ००, ७८९ अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०३) मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम (सीएमईजीपी) (कार्यक्रम) (२८५१६६९२) या लेखाशिर्षाखाली रु.२०००.०० लाख इतका नियतव्यय मंजूर आहे.

त्या अनुषंगाने वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ व २ येथील परिपत्रकान्वये राज्यात कोरोना विषाणूमुळे उद्भवलेली महामारीची परिस्थिती विचारात घेऊन सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या अनिवार्य व कार्यक्रम खर्चाच्या एकूण वार्षिक अर्थसंकल्पित तरतूदींच्या ६० टक्क्यांच्या मर्यादेत निधी वितरीत करण्यास मंजूरी देण्यात आली आहे. तथापि उपरोक्त संदर्भ क्र.३ मधील उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या नस्तीवर मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम या योजनेसाठी वित्त विभागाने सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता (२८५१६६९२) या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पीत निधीच्या ४० टक्के म्हणजेच रु.८००.०० लाख इतका निधी वितरीत करण्यास मान्यता दिली आहे. यास्तव मुख्यमंत्री रोजगार निर्मिती कार्यक्रम (२८५१६६९२) या लेखाशिर्षाखाली रु. ८००.०० लाख इतकी रक्कम प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व ऊद्योग, ऊर्जा व कामगार विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२४.६.२०२१ व दि. १४.१०.२०२१ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. २४.६.२०२१ व दि. १४.१०.२०२१ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.८९५/व्यय-१४, दि.०७.१०.२०२१ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलबध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२१११७१२१९१७२४२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Prashant Pundlik Wagh

Digitally signed by Prashant Pundlik Wagh
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice & Special Assist Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, serialNumber=5599270e38b296e5e5d814ff5976561a3ec66d875aeb425d735e1d7c12140929, cn=Prashant Pundlik Wagh
Date: 2021.11.17 12:20:59 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) प्रधान सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विज वितरण कंपनी मर्या, प्रकाशगड, बांद्रा(पूर्व), मुंबई
४) सर्व प्रादेशिक उप आयुक्त (समाजकल्याण) (समाजकल्याण आयुक्तालयामार्फत)
५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
६) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
७) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
९) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग